मंत्रालयाबाहेरील कार्यालयांत उच्चश्रेणी
लघुलेखकाच्या पदोन्नतीच्या साराचे
"स्वीय सहायक" पद निर्माण करणे.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-१०८९/प्र.क्र. १५/८९/बारा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १६ ऑक्टोबर, १९९०.

## शासन निर्णय

वेतन समानीकरण समितीने आपल्या अहवालातील परिच्छेद ३.२१ मध्ये केंद्रीय सचिवालयाबाहेर, वरिष्ठ प्रशासकीय श्रेणीचे किंवा तत्सम पदावरील अधिकाऱ्यांचे लघुलेखकांना बढतीच्या पदाची तरतूद आहे, त्यामुळे मंत्रालयाबाहेरील शासकीय कार्यालयाचे वरिष्ठ प्रशासकीय श्रेणी रु.५१००-६७०० व त्यावरील श्रेणीतील अधिकाऱ्यांच्या लघुलेखकांना बढतीचे पद निर्माण केल्यास मंत्रालयातील निवडश्रेणी लघुलेखकांसाठी मंजूर केलेली रु.२३७५-३५०० ही वेतनश्रेणी मंजूर करावी अशी शिफारस केली आहे. या अनुषंगाने पदोन्नतीची पदे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासनाने आता असे ठरविले आहे की, मंत्रालयाबाहेरील शासकीय कार्यालयामध्ये किंवा विभागात एका नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या कक्षेत उच्चश्रेणी लघुलेखकांची ४ किंवा त्यापेक्षा अधिक पदे असतील तर अशा प्रत्येक ४ पदांपैकी एक पदोन्नतीचे पद [२५ टक्के या प्रमाणात तथापि अपूर्णांक दुर्लक्षित करण्यात यावेत] रु.२३७५-७५-३२००-द.रो.१००-३५०० ह्या वेतनश्रेणीमध्ये मंजूर करण्यात यावे. त्या पदाचे "स्वीय सहायक" असे पदनाम करण्यात यावे व त्या पदास राजपत्रित [वर्ग-२] दर्जा देण्यात यावा. मात्र ज्या विभागाच्या एका नियुक्ती प्राधिकाऱ्याच्या कक्षेत उच्चश्रेणी लघुलेखकाची ४ पेक्षा कमी पदे असतील तेथे पदोन्नतीचे पद उपलब्ध होणार नाही. ही योजना राबविताना मंत्रालयाच्या बाहेरील प्रत्येक नियुक्ती अधिकाऱ्याच्या कक्षेतील उच्चश्रेणी लघुलेखक संवर्गाचा स्वतंत्रपणे विचार करण्यात यावा. अशा रितीने वरील सूत्राप्रमाणे पदे मंजूर करण्याची गरज असेल तर, त्याबाबतची तपासणी करून त्या ठिकाणी "स्वीय सहाय्यक" हे पद उपलब्ध केल्यानंतर तेथील ज्येष्ठ व योग्य अशा उच्चश्रेणी लघुलेखकाला विहित कार्यपध्दती अनुसरून पदोन्नती देण्याबाबतची कार्यवाही संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी करावी, याबाबतचे अधिकार त्यांना याद्वारे प्रदान करण्यात येत आहेत.

३. "स्वीय सहायक" या नवीन अस्तित्वात येणाऱ्या पदास जरी राजपत्रित दर्जा देण्यात आला तरी ही पदे भरण्याची कार्यवाही शासनास दुय्यम असलेल्या प्राधिकाऱ्यांकडून होणार असल्याने ही पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोग [विचार विनिमयापासून सूट] विनियम, १९६५ च्या विनियम २ च्या अनुसूचितील क्र. ३३ मध्ये विनिर्दिष्ट होतील.

[कृ.मा.प.]

व त्यामुळे त्या पदांवर भरती करण्याच्या पध्दतीसंबंधीच्या कोणत्याही बाबीविषयी तसेच त्या पदांवर नियुक्ती करतांना अथवा बदल्या करतांना कोणत्याही बाबीविषयी आयोगाशी विचारविनिमय करणे आवश्यक असणार नाही.

सदरहू आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८८९/९०/सेवा-१० दिनांक १४ सप्टेंबर, १९९० अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

भा. म. भणगे,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, [पत्राने],
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई, [पत्राने],
प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,[पत्राने]
शासनाचे सर्व सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
वेगवेगळ्या मंत्रालयीन विभागांच्या अखत्यारीतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग.

--------